## गणपतीची आरती

३९९६ सद्‌गुरूची चंद्र उदयो पै झाला । वाग्देवी वाक्य गणेश देखिला । चौथी भक्तिज्ञानें चौथीसी आला । गुरूज्ञानमूर्ति पूर्ण बिंबला ॥१॥ जयदेव जयदेव जय मंगलमूर्ति । कार्यसिद्धी व्रत संकट चतुर्थी ॥धृ.॥ शुद्ध पक्षीं ज्ञान वद्य पक्षीं सीध चौथी । कार्यसिद्धी तेथें सूर्याची स्थिती । मंत्रयुक्त पूजा अक्षदा हातीं । चिद्‌चैतन्य दुर्वा सद्‌बुद्ध विर्त्ती ॥ २ ॥ प्रेमाचें मोदक निर भावें क्षीर । प्रबोध लाडू गोड गोड साकर ॥ पंचभूताचे खाजे शोभती कर । महाप्रळयीं क्षुधेसी आहार ॥ ३ ॥ नवनीत निज घृतावि धार । नवविधा भक्ती पूजा उपचार । शुद्ध सुमनें ठेवा सायुज्य सार । निजभक्तीभावें करितों नमस्कार ॥ ४ ॥ देई देवा सद्‌गुरू मन उन्मन । सकाम निष्काम कामना पूर्ण । भुक्ती मुक्ती देवो प्रसन्न वदन । कृपा विश्वरूप एका जनार्दन ॥ ५ ॥

## हनुमंताची आरती

३९९७ जयदेवा हनुमंता । जयजय अंजनीसुता । आरती वोवाळीन । राया रामाच्या दूता ॥ धृ. ॥ वानरीरूपधारी ज्याची अंजनी माता । हिंडतां वनांतरीं । भेटी झाली रघुनाथा । धन्य तो रामभक्त । तेही मांडिली कथा ॥ १ ॥ सीतेचे शुद्धी सांगे । रामें दिधली आज्ञा । उल्लंघुनी समुद्रतीर । गेले लंकेच्या भुवना । शोधिलें अशोकवन । मुद्रा टाकिली खूण । सीतेसी दंडवत । दोन्हीं कर जोडून ॥ २ ॥ निकुंब बळे इंद्रजीत । होम करी आपण । तोहि तो विध्वंसिला । लघुशंका करून । देखुनी पळताती । भुतें महादारूण ॥ ३ ॥ देऊनी भुभुःकार । नरलोक आटले । रामहि लक्षुमण । जरी पाताळीं नेले । तयांचे शुद्धीसाठीं । जळीं प्रवेश केले । अहिरावण महिरावण । क्षणामाजीं निर्दाळिले ॥ ४ ॥ हनुमंता नाम तूंतें । किती वर्णू मी दातारा । अससी सर्व ठायीं । आजूबाजू आमरा । स्वामीसी सोडविले । दिनानाथ माहेरा । एका जनार्दनीं । मुक्ति झाली संसारा ॥५॥

## देवीची आरती

३९९८ मोहो म्हैषासुर मारूनी बोध त्रिशुळ गळा । कामक्रोध चंड मुंडवो मर्दिले लीळा । लिंग देहे रक्तबिंदु रोशे शोषी सगळा । कर्मोकर्मीं शुंभनिशुंभ निवटिले लीळा ॥ १ ॥ अनादि सिद्ध तूं वो अक्षरें अविनाश योगिनी । ब्रह्मादिका अगोचर ब्रह्मरूप ब्रह्मीणी । सहज तूं शिवशांभवे चैतन्य भवानी ॥धृ.॥ प्रकृतीचा आंगीं तूं खेळसी पर पुरूषपण । नित्य आरती उजळली उदो उदो म्हणोन । अनुहात चौन्डके वाजती तेणें येती स्फुरण । चौर्‍यांयेशी लक्ष भुतावळें नाचविशी तूं प्राण ॥ २ ॥ अभिन्नव तुझीं दरूशनें पाहणें मज । उरी सीरी बाहु भूषणें वैष्णव रज । निजतेजें दिवीं उजळूं वोवाळूं सहज । सच्चिदानंद गोंधळी नाचसी तूं भोज ॥ ३ ॥ दृश्य वो दृष्टा दोन्हीं सारुनि दरूशन देणें । देखत देखणें गिळुनी तुझें स्वरूप पाहणें । स्थावर जंगम तूंचि तूं एकलें एकपणें । जिवदान बळी दिधल्यापरी प्रसन्न होणें ॥ ४ ॥ प्रणव पिठींची त्रिपुटी मैदानी वरती । त्रिगुण गिळीले अव्यक्त व्यक्ती । स्वानंद घट भरोनि चैतन्य शक्ती । एका जनार्दन एकाएकी एकलेचि प्राप्ती ॥ ५ ॥

## तुळसीची आरती

३९९९ प्रातःकाळीं तुझें उत्तम रूप । दर्शन केलीया जाईल पाप । पूजन केलीया प्राप्त वैकुंठ । न कळे महिमा तुझी तूं माय श्रेष्ठ ॥ १ ॥ जयदेव जयदेव जयमाय तुळशी । कलीयुगीं तारक तूं एक होशी ॥धृ.॥ उत्तम रूप स्वरूप सुंदरी । तुझे अंगीं वेद असे पैं चारी । तुझी पूजा करिती पुष्पें नरनारी । त्यासी भुक्ति मुक्ति होती पैं चारी ॥ २ ॥ थोर तुझा महिमा कार्तिक मासीं । राधा दामोदर असती तुजपाशीं । तुळशी वृंदावनीं तूं हो राहासी । तुझा महिमा आहे समस्त देवासी ॥ ३ ॥ रामकृष्ण तुळशी नाहीं हो भेद । तुळशी वृंदावनीं असती गोविंद । तुळशी वृंदावनीं करिती आनंद । एका जनार्दनीं तुळशीची छंद ॥ ४ ॥

## दत्ताची आरती

४००० स्वानंदें आरती दत्त पाहूं गेले डोळां । तंव चराचर अवघा श्रीदत्त स्वलीला ॥ १ ॥ विस्मये दाटले आतां वोवाळूं कैसें । देखते देखणें श्रीदत्तची दिसे ॥ धृ. ॥ असे आणि नसे हा तो विकल्प जना । दत्तीं दत्तस्थिति जनीं देखुनी जनार्दना ॥ २ ॥ जनीं जनार्दनीं निजरूप दत्त । एका जनार्दनीं तेथें अद्वैत नित्य ॥ ३ ॥

### जनार्दनाची आरती

४००१ जयदेव जयदेव जय जनार्दना । परमार्थे आरती भावार्थे आरती अभिन्न भावना ॥ धृ. ॥ अवलोकितां जन न दिसे जनार्दन । भिन्नाभिन्न कैंचा दावी अभिन्न । अनेक एकत्व दिसे परिपूर्ण । थकली मन बुद्धि कैंचा गुण अवगुण ॥ १ ॥ ज्योतिचीया ज्योति उजळली दीप्ती । तेणें तेजें झाली सतेज आरती । पाहाणें तें पाहाणेंपण पहावया स्थिती । नुरेचि पैं वेगळा देहा नवी तृप्ती ॥२॥ उजाळिता उजळेना उजळावयालागीं । वेगळेपण कैंचे नुरेचि भागी । आंगची अर्पिला आंगींचा अंगीं । जीवशीवपण गेलें हारपोनी वेगीं ॥ ३ ॥ पाठ ना पोट अवघा निघोट । सर्वांगीं देखणा सर्वां वरिष्ठ । विष्ट ना निष्ट गुप्त ना प्रगट । ओहं सोहं सगट भरियेला घोट ॥ ४ ॥ सर्वदा दिसे परी नाकळे मना । जें जें दिसे तें तें दर्शन जाणा । अभाव भावनेसी हरली भावना । अभिन्नव आरती एका जनार्दना ॥ ५ ॥

## भानुदासमहाराज यांच्या अभंगाची वर्णानुक्रमणिका

# जनार्दनमहाराज यांच्या अभंगाची वर्णानुक्रमणिका



# एकनाथमहाराज यांच्या अभंगाची वर्णानुक्रमणिका

म.

समाप्त

प्रकाशक :
ज. शं. आपटे
इंदिरा प्रकाशन
२७०, सदाशिव, पुणें २.

मुद्रक :
शं. त्र्यं. आपटे
इंदिरा प्रेस
२७०, सदाशिव, पुणें २.